**<u>अनुदान वाटप</u>**
**जिल्हा परिषद व पंचायत समिती सार्वत्रिक निवडणुकांच्या कार्यालयीन खर्चासाठी अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः जिपनी-२०१६/प्र.क्र.७०/पंरा-२

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ००१.
तारीख: १० फेब्रुवारी, २०१७.

**<u>संदर्भ:-</u>**

१. या कार्यालयाकडील शासन निर्णय क्रमांक जिपनी-२०१५/प्र.क्र.४९/पं.रा.२, दिनांक २ नोव्हेंबर २०१५.
२. या कार्यालयाकडील शासन निर्णय समक्रमांक, दिनांक २६ ऑक्टोंबर २०१६.
३. राज्य निवडणुक आयोगाचे पत्र क्रमांक रानिआ/जिपपंस-२०१६/ प्र.क्र.५१/ कार्या-७, दिनांक ११ जानेवारी २०१७.
४. या कार्यालयाकडील शासन निर्णय समक्रमांक, दिनांक २४ जानेवारी २०१७.
५. जिल्हाधिकारी गडचिरोली यांचे पत्र क्रमांक कार्या-१०/आस्था-निवड/ कावि/ १०९/२०१७, दिनांक २७ जानेवारी २०१७.

**<u>प्रस्तावना</u>**

राज्यातील २५ जिल्हा परिषदा व त्याअंतर्गत येणा-या २८३ पंचायत समित्यांच्या सार्वत्रिक निवडणुकांचा कार्यक्रम राज्य निवडणुक आयोगाने दिनांक ११ जानेवारी २०१७ रोजी जाहीर केलेला असुन गडचिरोली जिल्हयामध्ये दिनांक १६ फेब्रुवारी २०१७ रोजी पहिल्या टप्प्यात मतदान होणार आहे.

या जिल्हा परिषदांच्या निवडणुकांच्या कार्यालयीन खर्चामध्ये येणा-या विविध बाबींसाठी दिनांक २४ जानेवारी २०१७ च्या शासन निर्णयाव्दारे अनुदान उपलब्ध करुन देण्यात आलेले आहे. तथापि, जिल्हाधिकारी गडचिरोली यांनी गडचिरोली जिल्हा हा डोंगराळ व जंगलाने व्याप्त

असुन या जिल्हयात निवडणुकांदरम्यान नक्षलवादी कारवाया वाढत असुन जिल्हा मुख्यालयापासुन शेवटच्या तालुक्याचे अंतर २२० कि.मी. पर्यंत आहे. या जिल्हयातील वाहतुकीची साधने कमी प्रमाणात असल्यामुळे निवडणूकीकरीता खाजगी वाहने मोठया प्रमाणात भाडयाने घ्यावे लागतात तसेच इतर जिल्हयांच्या तुलनेत गडचिरोली जिल्हयाची भौगोलिक परिस्थिती वेगळी असल्याने येथील काही मतदान केंद्रावर मतदान पथकांना हेलीकॉप्टरने पोहोचवावे लागते व सदर पथकांना मतदान प्रक्रिया पुर्ण झाल्यानंतर परत आणावे लागते. त्यामुळे या जिल्हयात निवडणूकीकरीता मोठया प्रमाणात निवडणुक खर्च करावा लागतो. ही बाब विचारात घेऊन अतिरीक्त अनुदानाची मागणी जिल्हाधिकारी यांनी केली आहे. जिल्हाधिकारी गडचिरोली यांनी केलेल्या विनंती नुसार व उपलब्ध निधीची मर्यादा लक्षात घेवुन गडचिरोली जिल्हयाला खालीलप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

## शासन निर्णय:-

लेखाशिर्ष - मागणी क्र.एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन, (०२) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणुकांबाबतचा खर्च, (०२) (०१) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणूकाबाबतचा खर्च, (२०५३ ०५२९) दत्तमत (योजनेतर) (राज्यक्षेत्र)" या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ साठी मंजुर करण्यात आलेल्या आर्थिक तरतुदी मधुन, जिल्हा परिषद व पंचायत समित्यांच्या सार्वत्रिक निवडणुकांच्या कार्यालयीन खर्चासाठी खालील विवरणपत्रात दर्शविल्यानुसार निधी संबंधित जिल्हाधिकारी गडचिरोली यांच्याकडे खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून सुपूर्द करण्यात येत आहे.

**विवरणपत्र**

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | दिनांक २६.१०.२०१६, दिनांक २४.०१.२०१७ व दिनांक ९.२.२०१७ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेले एकुण अनुदान | दिनांक १०.२.२०१७ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात येत असलेले अतिरिक्त अनुदान | एकुण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | नागपूर | गडचिरोली | रु.२,४०,८१,८४० /- | रु.४,८१,००,३८०/- | रु.७,२१,८२,२२०/- |

(अ) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान हे शासनाने वेळोवेळी निश्चित केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन आहे.

(ब) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान हे जिल्हा परिषद व पंचायत समिती सार्वत्रिक निवडणुकांसाठी कार्यालयीन खर्चासाठी वापरण्यात यावे. याकामी कोणतीही अनियमितता होणार नाही व अनावश्यक खर्च होणार नाही याची काळजी विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.

(क) मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही आणि कोणतीही अनियमितता घडणार नाही, याची दक्षता विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी घ्यावी व शिल्लक रक्कम दि.३१.३.२०१७ पुर्वी समर्पित करावी.

(ड) या अनुदानातून होणाऱ्या खर्चाची विवरणपत्रे विभागीय आयुक्त यांनी राज्य निवडणूक आयोग व शासनाकडे पुढील १५ तारखेपूर्वी सादर करावीत, खर्चावर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

(इ) सदर अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणालीनुसार (B.D.S) जिल्हाधिकारी यांचा (युजर आयडी क्रमांक ००९३०), उप जिल्हा निवडणूक अधिकारी (युजर आयडी क्रमांक ०००९३४), जिल्हाधिकारी यांचे प्रमुख लिपिक (युजर आयडी क्रमांक ०००९४८) यांच्या युजर आयडीवर वितरीत करण्यात येत आहे.

(ई) उपरोक्त प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र.एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन, (०२) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणुकांबाबतचा खर्च, (०२) (०१) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणूकाबाबतचा खर्च, (२०५३ ०५२९) दत्तमत (योजनेतर) (राज्यक्षेत्र)" या लेखाशीर्षाखालील सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२०९१८५००९३९२०, असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R Bankar

Digitally signed by Sanjay R Bankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, cn=Sanjay R Bankar
Date: 2017.02.10 12:02:28 +05'30'

**संजय बनकर**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. सचिव, राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई-३२.

२) मा.विभागीय आयुक्त, नागपुर.

३) मा.जिल्हाधिकारी, गडचिरोली.

४) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई, नागपूर

५) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व परिक्षण) मुंबई, नागपूर

६) जिल्हा लेखा कोषागार अधिकारी, गडचिरोली.

७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई (दोन प्रती)

८) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, कार्यासन क्रमांक वित्त-१, वित्त-७ व वित्त-८.

९) वित्त विभाग/ (अर्थसंकल्प-३, १६ व व्यय-१५), मंत्रालय, मुंबई.

१०) निवडनस्ती.